सन २०२०-२१ करिता कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस, ऊस) ₹६४.३३५ लक्ष निधी सर्वसाधारण प्रवर्गासाठी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राअसु-२०२०/प्र.क्र.३९/४-अे.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२०

संदर्भ:-

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण/२०१७-प्र.क्र.३१/१७-अे, दि .१९/०४/२०१७.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६/०४/२०२०
३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४/०५/२०२०
४. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०२० –CU-IV दि.१८/०५/२०२०
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राअसु-२०२०/प्र.क्र.३४/४-अे, दि.०४/०६/२०२०
६. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०२० –CU-IV दि. १७/०६/२०२०
७. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.विप्र३/राअसुकापूस/अनु./२७९/२०, दि.२२/०६/२०२०
८. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.विप्र३/राअसुकापूस/अनु./१८८४०/२०, दि.१२/०८/२०२०

प्रस्तावना :-

सन २०२०-२१ करिता केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) संदर्भ क्र.४ येथील दि.१८/०५/२०२० च्या पत्रान्वये ₹८९८.६६ लाख (केंद्र हिस्सा रु.५३९.१९ लाख + राज्य हिस्सा रु.३५९.४७ लाख) रकमेचा कृती आराखडा मंजूर केला आहे. तथापि कोविड-१९ च्या पार्श्वभूमिवर वित्त विभागाचे दि.०४ मे. २०२० च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.२ नुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) ₹३१३.५८ लाख (केंद्र हिस्सा रु.१८८.१५ लाख + राज्य हिस्सा रु.१२५.४३ लाख) रकमेच्या वार्षिक कृती आराखडयास संदर्भ क्र.५ येथील दि.०४/०६/२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने अभियानांतर्गत संदर्भ क्र.६ येथील दिनांक १७/०६/२०२० च्या पत्रान्वये पहिल्या हप्त्यात केंद्र हिस्स्याचा **₹** २६९.६० लक्ष निधी वितरीत केला आहे. केंद्र शासनाने सर्वसाधारण प्रवर्गासाठी मुक्त केलेला व आयुक्तालयाने संदर्भ क्र.७ येथील दि.२२/०६/२०२० च्या पत्रान्वये

प्रस्तावित केल्याप्रमाणे केंद्र हिस्स्याचा रु.२०८.१२ लाख त्यास समरुप राज्य हिस्याचा ₹१३८.७४६ लाख असा एकूण ₹३४६.८६६ लाख निधी वितरणाचा प्रस्ताव मान्यतेस्तव वित्त विभागास सादर केला होता. वित्त विभागाने सदर निधी वितरणाच्या ३५ टक्के निधी वितरीत करण्याबाबतचे निदेश दिले आहेत. तथापि आयुक्तालयाने संदर्भ क्र.८ येथील दि.१२/०८/२०२० च्या पत्रान्वये सदर अभियानातंर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिस्स्याचा रु.३८.६०३ लाख व राज्य हिस्याचा ₹२५.७३२ लाख असा एकूण ₹६४.३३५ लाख निधी वितरणाचा सुधारीत प्रस्ताव प्रस्तावित केला आहे. त्यानुसार सदर अभियानातंर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा आवश्यक निधी वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे-

**शासन निर्णयः**

१. सन २०२०-२१ करिता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस , ऊस) **सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण ₹ ६४.३३५ लाख निधी (रुपये चौसष्ट लाख तेहतीस हजार पाचशे फक्त)** आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचे पीक निहाय तसेच केंद्र व राज्य हिस्स्याचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

**(₹ लाख)**

| अ. क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत वाणिज्यिक पिके | सर्वसाधारण प्रवर्ग | | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | |
| १. | कापूस | १८.९३३ | १२.६२२ | ३१.५५५ |
| २. | ऊस | १९.६७ | १३.११ | ३२.७८ |
| | **एकूण** | **३८.६०३** | **२५.७३२** | **६४.३३५** |

२. परिच्छेद १ मध्ये नमूद केल्यानुसार **कापूस पिकांकरिता** केंद्र हिस्स्याचा ₹१८.९३३ लाख निधी ( रुपये अठरा लाख त्र्याण्णव हजार तीनशे फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹१२.६२२ लाख निधी ( रुपये बारा लाख बासष्ट हजार दोनशे फक्त) असा एकूण रु.३१.५५५ लक्ष निधी (रुपये एकतीस लाख पंचावन हजार पाचशे फक्त) वितरीत करण्यात येत आहे .

३. परिच्छेद १ मध्ये नमूद केल्यानुसार **ऊस पिकांकरिता** केंद्र हिस्स्याचा ₹ १९.६७ लाख निधी (रुपये एकोणीस लाख सदुसष्ट हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹ १३.११ लाख निधी ( रुपये तेरा लाख अकरा हजार फक्त ) असा एकूण ₹ ३२.७८ लाख निधी ( रुपये बत्तीस लाख अठ्ठ्यात्तर हजार फक्त ) वितरीत करण्यात येत आहे.

४. परिच्छेद क्र. १ ते ३ मध्ये नमूद केल्यानुसार, कापूस, ऊस या पिकांकरिता वितरीत केलेला सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी सन २०२०-२१ मध्ये पुढील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा:-

| केंद्र/राज्य हिस्सा | सर्वसाधारण प्रवर्ग | |
|---|---|---|
| | कापूस | ऊस |
| केंद्र हिस्सा | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>१०८, वाणिज्यीक पिके<br>(०१) (०२) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-कापूस (केंद्र हिस्सा ६०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ २५४२)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>१०८, वाणिज्यीक पिके<br>(०२) (०८) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-ऊस (केंद्र हिस्सा ६०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ ४०५१)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |
| राज्य हिस्सा | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>१०८, वाणिज्यीक पिके<br>(०१) (१६) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-कापूस (राज्य हिस्सा ४०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ A२५२)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>१०८, वाणिज्यीक पिके<br>(०२) (११) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-ऊस (राज्य हिस्सा ४०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ A२४३)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |

५. सन २०२०-२१ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या द्दष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि),<br>कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

६. शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ₹ ६४.३३५ लाख निधी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी PFMS प्रणालीद्वारे जिल्हा निहाय वितरीत करावा.

७. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे सचिव (कृषी) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६/०४/२०२०नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११८/२०२०/व्यय-१, दि.१७/०७/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८२६१४५६५८२२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ZENDAGE MAHAVEER BALASAHEB

Digitally signed by ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23cb110d23, postalCode=400032, street=MADAM CAMA ROAD,MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=43d7bb272129cd1382853268481cb2ceee1f236d393acecb71084bc36ffeed02, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
Date: 2020.08.26 15:02:09 +05'30'

**( महावीर झेंडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई
८. सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.

९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२.सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
१४.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१९.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती-४अे.